वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत परभणी जिल्ह्यातील कामांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## इतर मागास बहुजन कल्याण विभाग
## शासन ज्ञापन क्रमांकः तांसुयो-२०२२/प्र.क्र.६० (भाग-२)/योजना-१

नवीन प्रशासकीय इमारत, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १२ जुलै, २०२३

संदर्भ :- १) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: तांसुयो-२०२२/प्र.क्र.६०/योजना-१, दिनांक ३१.०३.२०२२.
२) शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, क्रमांक: तांसुयो-२०२२/प्र.क्र.६०(भाग-२)/योजना-१/दिनांक ३१.०३.२०२३.
३) सहायक आयुक्त, समाज कल्याण, परभणी यांचे क्रमांक २४७४, दिनांक १८.०४.२०२३ चे पत्र.

ज्ञापन :-

वसंतराव नाईक तांडा वस्ती सुधार योजनेंतर्गत परभणी जिल्ह्याकरीता संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये, रु.९७.५० लक्ष रक्कमेच्या १३ कामांना प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये सदरहू १३ कामांपैकी ६ कामांवरील स्थगिती उठवून त्यांकरीता निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तथापि, तांत्रिक अडचणींमुळे सदरहू कामांसाठी आवश्यक निधी वितरीत करता आला नाही. सदरहू कामांसाठी आवश्यक तरतूद उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्रमांक ३ अन्वये प्राप्त झाला आहे.

२. यास्तव, शासन निर्णय दिनांक ३१.०३.२०२२ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या खालील नमूद कामांसाठी रु.३८.५० लक्ष (अक्षरी रुपये अडतीस लक्ष पन्नास हजार फक्त) इतका निधी वितरीत करण्यास या ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे:-

(रु.लक्षमध्ये)

| अ.क्र. | शा.नि.दिनांक ३१.०३.२०२२ मधील अ.क्र. | तालुका | ग्रामपंचायतीचे नाव | तांडा / वस्तीचे नाव व लोकसंख्या | कामाचे स्वरुप | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | ९ | पाथरी | सारोळा बु. | धनगर गल्ली | एल.ई.डी.विद्युतीकरण | १०.०० |
| २. | १० | पाथरी | बाभळगांव | गोसावी गल्ली दत्तनगर | सिमेंट रोड बांधकाम करणे | ४.०० |
| ३. | ११ | पाथरी | बाभळगांव | अहिल्यानगर | एल.ई.डी.पथदिवे बसविणे | ६.०० |

| अ.क्र. | शा.नि.दिनांक ३१.०३.२०२२ मधील अ.क्र. | तालुका | ग्रामपंचायतीचे नाव | तांडा / वस्तीचे नाव व लोकसंख्या | कामाचे स्वरुप | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| ४. | १२ | पाथरी | बाभळगांव | धनगर गल्ली / यशवंतराव होळकर नगर | एल.ई.डी.विद्युतीकरण करणे | १०.०० |
| ५. | १३ | पाथरी | खेडुळा | धनगर वस्ती | पेव्हर ब्लॉक बसविणे | २.५० |
| ६. | १४ | पाथरी | चाटे पिंपळगाव | धनगर गल्ली | एल.ई.डी.विद्युतीकरण करणे | ६.०० |
| | | | | **एकूण** | | **३८.५०** |

३. सदर निधी वितरीत करण्यासाठी उपसचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय मुंबई यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून तसेच सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, परभणी यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण परभणी यांनी वरील निधी वितरीत करण्यापुर्वी संदर्भाधिन शासन निर्णयांतील अटी व शर्तींची पुर्तता होत असल्याची खातरजमा करावी.

५. यावरील खर्च "मागणी क्र.झेडजी-३, २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ८०-सर्वसाधारण, १०२-स्वयंसेवी संस्थांना मदत, (०२) तांडा वस्ती सुधार योजना,(०२)(०१) विजाभज आणि विमाप्र यांच्यासाठी तांडा वस्ती सुधार योजना (कार्यक्रम), ३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (कार्यक्रम) (दत्तमत) (२२२५ एफ ०५८)" या लेखाशिर्षांतर्गत २०२३-२४ या वर्षात उपलब्ध आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

६. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७१२१८४१५७३३३४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHANT
SHRIRANG
KUMBHAR

Digitally signed by SUSHANT SHRIRANG KUMBHAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2121bd11b9a537ffee960f52794a0a1244969254517ad088cf267eaedf9b53f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5E8A8657AC266FF9154647CC20900A57B2BA9AD3DB088D187EB151F2E10F16C3, cn=SUSHANT SHRIRANG KUMBHAR
Date: 2023.07.12 18:44:29 +05'30'

**(सु. श्री. कुंभार)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजना, परभणी.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी.
५. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.

६. महालेखापाल महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर.
७. उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण (प्रादेशिक) विभाग, औरंगाबाद.
८. सहायक आयुक्त, समाज कल्याण, परभणी.
९. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, परभणी.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
११. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा व निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. उप सचिव (का-१३१४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. उप सचिव (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती (योजना-१).